**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०२१७/प्र.क्र.७८/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०१ जुलै, २०१७.

**विषय** :- पोलीस अधीक्षक, पुणे (ग्रामीण), यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस मुख्यालय, चव्हाणनगर, पुणे येथील इमारत "बी," "सी" व "डी" यांच्या दुरूस्ती करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ दुरुस्ती-कार्यक्रम-आढावा/ ३७१/ ०९, दिनांक ०१.१०.२०१६.

**ज्ञापन :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी पोलीस मुख्यालय, चव्हाणनगर, पुणे येथील इमारत "बी," "सी" व "डी" यांच्या दुरूस्ती करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी, उप-अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, राजभवन, पुणे, यांनी सन २०१६-१७ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.१,५५,३५,९७७/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे आणि अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, पुणे, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते **रु.१,५७,७७,९९०/-** असे सुधारले आहे आणि त्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, पोलीस मुख्यालय, चव्हाणनगर, पुणे येथील इमारत "बी," "सी" व "डी" यांच्या दुरूस्ती करण्यासाठी **रु.१,५७,७७,९९०/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००) (०१), जिल्हा पोलीस बल, (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या खाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३३/इमा-२, दिनांक ०४.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०७१९१६०५५७७३२९ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.07.19 16:21:50 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर.
४) पोलीस अधीक्षक, पुणे (ग्रामीण).
५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, पुणे.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
९) निवड फाईल (पोल-७).